GR-200404101608420001-ब100

**मराठी व हिन्दी भाषा परीक्षा उत्तीर्ण होणे/सूट देणे याबाबत नोंदी सेवापुस्तकात घेणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन परिपत्रक क्रमांक : मभाप-२००१/प्र.क्र.६८/२००१/२०-ब,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक : २५ सप्टेंबर,२००१.**

वाचा : १) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक:मभाप-१०८७/१४/सीआर-२/८७/२०, दि. ३०.१२.१९८७.

२) शासन अधिसूचना क्रमांक: मभाप-१०९७/१६५२/प्र.क्र.७२/९७/२०-ब, दि.७.२.२००१.

३) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक:हिंभाप-१०७६/२८, दि. १०.६.१९७६.

**शासन परिपत्रक:-**

शासनाने शासकीय कार्यालयातील सर्व अधिकाऱ्यांना व कर्मचाऱ्यांना, शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक:मभाप-१०८७/१४/सीआर-२/८७/२०, दिनांक ३०.१२.१९८७ व शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:हिंभाप-१०७६/२८, दिनांक १०.६.१९७६ नुसार अनुक्रमे मराठी भाषा परीक्षा नियमावली / हिन्दी भाषा परीक्षा नियमावली लागू केलेली असून भारतीय सेवेतील अधिकाऱ्यांसह, सर्व अधिकारी व कर्मचारी यांनी एतदर्थ मंडळाच्या मराठी भाषा (निम्नस्तर व उच्चस्तर) परीक्षा तसेच हिन्दी भाषा परीक्षा टप्प्या टप्प्याने विहित मुदतीत उत्तीर्ण होणे अगर त्यामधून सूट घेणे बंधनकारक आहे. सदर नियमावलीनुसार परीक्षा उत्तीर्ण होणे अगर त्यामधून सूट मिळणे याबाबींची नोंद अधिकाऱ्यांच्या / कर्मचाऱ्यांच्या सेवापुस्तकात संबंधीत विभाग प्रमुखांनी घेणे आवश्यक आहे. अशा नोंदी सेवापुस्तकात घेण्याची खबरदारी संबंधीत विभाग प्रमुखाकडून घेतली गेली नसल्याने सेवानिवृत्तीनंतर सेवानिवृत्त कर्मचाऱ्यांच्या बाबतीत वेतन पडताळणी पथकाने आक्षेप घेतल्याने बरीच प्रकरणे प्रलंबित असल्याचे व परिणामी सदर कर्मचारी त्यांच्या देय निवृत्ती वेतन आदी लाभापासून वंचित राहत असल्याचे या विभागाच्या निदर्शनास आले आहे. निवृत्तीवेतन वेळेवर न मिळाल्याने असे सेवानिवृत्त कर्मचारी / अधिकारी न्यायालयीन दाद मागण्यासाठी न्यायालयाकडे धाव घेत असल्याचेही निदर्शनास येत आहे.

याबाबत सर्वसाधारण आदेश काढावेत असेही मुख्य सचिव यांनी सूचित केले आहे. त्यानुसार सर्व मंत्रालयीन विभागांना पुन्हा कळविण्यात येत आहे की, एतदर्थ मंडळाची मराठी /हिन्दी भाषा परिक्षा उत्तीर्ण होण्याबाबतचे अथवा या परिक्षेतून सूट मिळण्याबाबतच्या नोंदी, मराठी / हिन्दी भाषा परीक्षा नियमावलीनुसार तपासून, आवश्यकता भासल्यास सामान्य प्रशासन विभागाची अनुमती घेऊन सेवा पुस्तकात वेळीच घ्याव्यात. सेवानिवृत्त अधिकाऱ्यांच्या/ कर्मचाऱ्यांच्या बाबतीत ते सेवानिवृत्त झाले आहेत, केवळ याच सबबीखाली त्यांना सूट किंवा सवलती देण्याचे टाळावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(भ.प्र.पारकर)
उप सचिव,महाराष्ट्र शासन

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
उप मुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव/अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा,मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा,मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त आणि उप लोक आयुक्त यांचे कार्यालय,मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई.
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन मुंबई.
* महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर,
* महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती,
* **पत्राने.**